कारागृह विभागाच्या निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली तीन नविन ॲम्बेसॅडर कार खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक:एमएजे २३००/प्र.क्र.११०/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २७ ऑक्टोबर, २००५.

वाचा:-१)कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वाहने खरेदी /४३४४/२००४-०५/क-३/४२२६,दि.२०.४.२००५.
२)शासनपत्र गृह विभाग क्र. एसयुपी ११०५/सीआर८४/बीयुडी-१, दि.२५.१०.२००५.

<u>शासन निर्णय</u> :- कारागृह विभागातील वरिष्ठ अधिका-यांना शासनाने कार्यालयीन कामाकरीता वाहने मंजूर केलेली आहेत. परंतु सध्याची वाहने निर्लेखित करण्यात आलेली असल्यामुळे सध्या कारागृह विभागातील वरिष्ठ अधिका-यांना वाहने उपलब्ध नसल्यामुळे या अधिका-यांना अचानक पहाणी करण्याकरीता किंवा आणीबाणीच्या प्रसंगी रात्री अपरात्री कर्तव्यार्थ जाताना अडचणी निर्माण होतात. परिणामत: कारागृह सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करता येत नाही. यास्तव कारागृह विभागाच्या वरिष्ठ अधिका-यांसाठी निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली तीन नविन ॲम्बेसॅडर वाहने खरेदी करण्यास राज्य स्तरीय वाहन धोरण समितीने त्यांच्या दि.३.१२.२००४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली होती. त्यास अनुसरुन शासन याद्वारे तीन नवीन ॲम्बेसॅडर कार खरेदी करण्यासाठी येणा-या रु.१०,२०,०००/- (रुपये दहा लाख वीस हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देत आहे.

यासाठी होणारा खर्च "२०५६-तुरुंग (०१) संचालन प्रशासन, ३० मोटारवाहने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००५-०६ या आर्थिक वर्षासाठी "२०५६ तुरुंग" या मुख्य लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर-४३३/ ०५/व्यय-८, दि.४.७.२००५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

आ.ग.परदेशी

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
अवर सचिव,बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबइ-३२
वित्त विभाग कार्यासन व्यय-८/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१०),मंत्रालय,मुंबई-३२
निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

****